**मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपील क्र.८९२८/२०१५ व इतर याचिका यामध्ये दि.६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासंदर्भात अभ्यास गटाची स्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बीसीसी २०१९/प्र.क्र.५८१/१६-ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : १५ जून, २०२०.

वाचा : शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, समक्रमांक दि.१२ जून, २०२०.

**प्रस्तावना :**

संदर्भाधिन शासन निर्णय अधिक्रमित करून सुधारीत शासन निर्णय खालीलप्रमाणे निर्गमित करण्यात येत आहे.

मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपील क्र.८९२८/२०१५ व इतर याचिका यामध्ये दि. ६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने अनुसूचित जमातीच्या प्रमाणपत्राच्या आधारे सेवेत रुजू झालेल्या व जात प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदावर वर्ग करण्याच्या सूचना दि.२१.१२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या आहेत. अधिसंख्य पदावर नेमणूक दिल्यानंतर त्यांना अनुज्ञेय करावयाच्या सेवाविषयक/ सेवानिवृत्तीविषयक लाभांबाबत सविस्तर अभ्यास करुन शासनास शिफारशी करण्यासाठी स्वतंत्र अभ्यास गट स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपील क्र.८९२८/२०१५ व इतर याचिका यामध्ये दि. ६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने अनुसूचित जमातीच्या प्रमाणपत्राच्या आधारे सेवेत रुजू झालेल्या व जात प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या अधिकारी/ कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदावर वर्ग करण्याच्या सूचना दि.२१.१२.२०१९ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या आहेत. अधिसंख्य पदावर नेमणूक दिल्यानंतर त्यांना अनुज्ञेय करावयाच्या सेवाविषयक/ सेवानिवृत्तीविषयक लाभांबाबत सविस्तर अभ्यास करुन शासनास शिफारशी करण्यासाठी मा. मंत्री (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण) यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे अभ्यास गट स्थापन करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| मा. मंत्री (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण) | अध्यक्ष |
| मा. मंत्री (आदिवासी विकास) | सदस्य |
| मा. मंत्री (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य) | सदस्य |
| मा. मंत्री ( इ.मा.व. व बहुजन कल्याण ) | सदस्य |
| मा. मंत्री (वने) | सदस्य |
| मा. मंत्री (गृहनिर्माण) | सदस्य |
| सचिव (साविस), सामान्य प्रशासन विभाग | सदस्य सचिव |

२. प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग व अपर मुख्य सचिव, वित्त हे आमंत्रित सदस्य असतील.

३. इतर प्रशासकीय विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांना आवश्यकतेनुसार अभ्यास गटाच्या बैठकींना आमंत्रित करण्यात येईल.

४. **अभ्यास गटाची कार्यकक्षा-** अभ्यास गटाने खालील बाबींवर आपल्या शिफारशी शासनास सादर कराव्यात-

(१) दि.२१.१२.२०१९ च्या शासन निर्णयातील परि.१ (अ) ते (इ) मधील कर्मचा-यांपैकी केवळ दि.१७.१०.२००१ रोजी अथवा त्यापुर्वी सेवेत नियुक्त झालेल्या अधिकारी व कर्मचा-यांच्या सेवा अधिसंख्य पदांवर दर्शविण्यात याव्यात अथवा त्यानंतर नियुक्त झालेल्या अधिकारी व कर्मचा-यांच्या सेवा देखील अधिसंख्य पदांवर दर्शविण्यात याव्यात.

(२) अधिसंख्य पदांवर सेवा वर्ग करण्यात आलेल्या अधिकारी व कर्मचा-यांच्या सेवा अधिसंख्य पदावर त्यांच्या सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यंत चालू ठेवाव्यात किंवा कसे?

(३) अधिसंख्य पदांवर सेवा वर्ग करण्यात आलेल्या अधिकारी व कर्मचा-यांना नियमित पदावर कार्यरत असणा-या अधिकारी व कर्मचा-यांप्रमाणे आश्वासित प्रगती योजना, पदोन्नती, वार्षिक वेतनवाढ, सेवानिवृत्ती वेतन, कुटुंब सेवानिवृत्ती वेतन, अनुकंपा तत्वावरील नियुक्ती यासारखे व इतर सेवाविषयक लाभ देण्यात यावेत किंवा कसे?

(४) जे अधिकारी/कर्मचारी जात वैधता प्रमाणपत्र सादर न करताच शासन सेवेतून नियत वयोमानुसार अथवा स्वेच्छा निवृत्तीने सेवानिवृत्त झाले असतील अथवा मृत्यू पावले असतील अथवा अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्यास असमर्थ असतील, अशा सेवानिवृत्त अधिकारी/कर्मचाऱ्यांना/ मृत्यू पावलेल्या अधिकारी /कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांना त्यांचे सेवानिवृत्ती विषयक सर्व अनुज्ञेय लाभ अनुज्ञेय करावेत किंवा कसे?

५. अभ्यास गटाने आपल्या शिफारशी तीन महिन्यात शासनास सादर कराव्यात.

६. सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharshatra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२००६१५१२५७४५५८०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rasik Ambadas Khadse

Digitally signed by Rasik Ambadas Khadse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fdc00fa9bc45e4f7281973d193127b8989dfa5df6a7a694b005e562ebd5c840e, serialNumber=a47200a14b42f151489f73f3e47c9e8733991629b2302a3831b945146be88a80, cn=Rasik Ambadas Khadse
Date: 2020.06.15 14:04:02 +05'30'

**( र. अं. खडसे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद
५) मा. विरोधी पक्षनेता, विधान सभा
६) सर्व विधान सभा सदस्य/ विधान परिषद, सदस्य
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
८) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
९) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान सभा)
१०) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद)
११) सर्व विभागीय आयुक्त
१२) सर्व सहायक आयुक्त (मागास वर्ग कक्ष)
१३) सर्व जिल्हाधिकारी
१४) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

१५) प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई
१६) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई
१७) प्रबंधक, लोकायुक्त आणि उपलोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१८)प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, नागपूर, औरंगाबाद
१९) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग
२०) सचिव, राज्य निवडणूक आयोग
२१) सचिव, राज्य माहिती आयोग
२२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२३) राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक
२४) सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
२५) सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा, नगरपालिका
२६) संचालक, समाजकल्याण, पुणे
२७)आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
२८)आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
२९) संचालक, सेवायोजन, मुंबई
३०) निवडनस्ती